सेवानिवृत्तीनंतर /मृत्यूनंतर शासकीय पोलीस निवासस्थान पोलीस सेवेतील कुटुंबिय व्यक्तीच्या नांवे वर्ग करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: आरएसए ०२९९/प्र.क्र.३८/पोल-७,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक: १० ऑक्टोबर २०००.**

**वाचा:-** शासन परिपत्रक, गृह विभाग, क्रमांक: आरएसए ०२९०/५/पोल-७, दिनांक: १७ मार्च,१९९४

**प्रस्तावना:-** गृह विभागाच्या अधिपत्याखालील विविध घटक प्रमुखांच्या आस्थापनेवरील पोलीस अधिकारी व कर्मचारी यांना त्यांच्या सेवा कालावधीतील वास्तव्यासाठी पोलीस निवासस्थानाचे वाटप केले जाते. असे पोलीस अधिकारी व कर्मचारी सेवानिवृत्त झाल्यानंतर त्यांच्या नांवे वाटप करण्यात आलेले पोलीस निवासस्थान पोलीस सेवेमध्ये असलेल्या त्यांच्या मुलाच्या नांवे वर्ग करण्याबाबत धोरणात्मक निर्णय शासन परिपत्रक, गृह विभाग, क्रमांक: आरएसए ०२९०/५/पोल-७, दिनांक १७ मार्च,१९९४ अन्वये घेण्यात आलेला आहे. त्यानुसार पोलीस विभागातील संबंधित अधिकारी/कर्मचारी याच्या सेवानिवृत्तीच्या दिनांकाच्या दिवशी पोलीस सेवेत असलेल्या त्याच्या मुलाची सलग ३ वर्षे शासन सेवा झाली असली पाहिजे, अशी अट विहित करण्यात आली होती.

**शासन निर्णय:-** उपरोक्त पार्श्वभूमीवर किमान ३ वर्षे सलग सेवेची अट शिथिल करुन तसेच यापूर्वीचे आदेश अधिक्रमित करुन सुधारित, स्वयंस्पष्ट आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. यास्तव आता शासन खालीलप्रमाणे सुधारित आदेश देत आहे:-

(अ) गृह विभागाच्या अधिपत्याखालील विविध पोलीस घटक प्रमुखाच्या आस्थापनेवरील पोलीस निवासस्थान मिळालेले पोलीस अधिकारी व कर्मचारी,नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त/शारिरिक विकलांगता, रुग्णता किंवा कायमचे अपंगत्व इत्यादी कारणांमुळे सक्तीने सेवानिवृत्त झाल्यास/अथवा सेवेत असताना कारवाईत वा अपघातात अकाली मृत झाल्यास संबंधित पोलीस अधिकारी/कर्मचारी याच्या समवेत राहणा-या व पोलीस

सेवेत असलेल्या कुटुंबातील व्यक्तीच्या नांवे सदर निवासस्थान वर्ग करताना ते खालील अटींच्या अधिन राहून वर्ग करण्यात यावे:-

१) अशा कुटुंबिय व्यक्तीची पोलीस सेवेत महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत किंवा सेवा प्रवेश नियमानुसार विहित मार्गाने नियमित नियुक्ती झालेली असावी.

२) अशा कुटुंबिय व्यक्तीची पोलीस सेवेतील नियुक्ती ही पोलीस विभागातील संबंधित अधिकारी/कर्मचारी (वडील/पती) सेवानिवृत्त/मृत होण्यापूर्वी झालेली असावी.

३) अशी कुटुंबिय व्यक्ती संबंधित सेवानिवृत्त/मृत पोलीस अधिकारी/कर्मचारी याच्या सोबत त्याच्या कुटुंबाचा घटक म्हणून वास्तव्य करीत असलेली असावी.

४) संबंधित सेवानिवृत्त/मृत पोलीस अधिकारी/कर्मचारी याचे व पोलीस सेवेत असलेल्या अशा कुटुंबिय व्यक्तीचे मुख्यालय एकच असले पाहिजे. तसेच संबंधित पोलीस अधिकारी/कर्मचारी प्रतिनियुक्तीवर असताना सेवानिवृत्त/मृत झाल्यास, त्यास देण्यात आलेले पोलीस निवासस्थान ज्या मुख्यालयाच्या आस्थापनेवर असेल, त्याच मुख्यालयाच्या आस्थापनेवर अशी कुटुंबिय व्यक्ती पोलीस सेवेत असली पाहिजे.

५) अशा कुटुंबिय व्यक्तींच्या नांवे वर्ग करण्यात येणारे निवासस्थान हे त्या कुटुंबिय व्यक्तीच्या वेतन श्रेणीच्या टप्प्यानुसार त्याला अनुज्ञेय असलेल्या क्षेत्रफळा इतकेच/टाईपचे असावे. - जर नांवावर वर्ग करावयाचे निवासस्थान कुटुंबीय व्यक्तीला अनुज्ञेय असलेल्या क्षेत्रफळापेक्षा/टाईपपेक्षा अधिक क्षेत्रफळाचे/मोठ्या टाईपचे असेल तर,अशावेळी त्या कुटुंबिय व्यक्तीला अनुज्ञेय असलेल्या क्षेत्रफळाचे/टाईपचे निवासस्थान प्राथम्याने त्याच ठिकाणी अथवा अन्यत्र उपलब्ध करुन देण्यात यावे.

६) पोलीस निवासस्थान नांवावर वर्ग करण्यापूर्वी अशा कुटुंबिय व्यक्तीने "घरभाडे भत्ता प्रदान करण्यात आलेला नाही/येत नाही" अशा आशयाचे प्रमाणपत्र कार्यालय प्रमुखामार्फत सादर करणे आवश्यक राहील. तसेच सदर निवासस्थान नांवावर वर्ग झाल्यावर देखिल अशा कुटुंबिय व्यक्तीला घरभाडे भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.

७) सेवानिवृत्तीनंतर स्वतःच्या राहण्याची अन्यत्र व्यवस्था केलेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्या कुटुंबिय व्यक्तींना ही सवलत अनुज्ञेय राहणार नाही.

८) पोलीस विभागाच्या आस्थापनेवरील मंत्रालयीन अधिकारी व कर्मचारी यांना

त्यांच्या पोलीस सेवेतील वडिलांच्या/पतीच्या नांवावरील पोलीस निवासस्थान वर्ग करुन देता येणार नाही. अशा मंत्रालयीन अधिकारी/कर्मचाऱ्यांना सामान्य प्रशासन विभागाकडून अभिहस्तांकित करण्यात आलेली अथवा सार्वजनिक बांधकाम विभागाच्या आस्थापनेवरील निवासस्थाने अनुज्ञेय राहतील व त्यांना सामान्य प्रशासन विभागाचे शासन परिपत्रक क्र. शानिवा-२५८६/प्र.क्र.६३/८६/२३-अ, दिनांक २७.९.९१ मधील तरतुदी लागू राहतील.

**<u>टीप:-</u>** वरील सर्व प्रकरणी सदर पोलीस निवासस्थान नांवावर वर्ग करण्यासाठी पात्र समजली जाणारी "कुटुंबिय व्यक्ती" विचारात घेताना संबंधित सेवानिवृत्त पोलीस अधिकारी/कर्मचारी याच्या बाबतीत त्याचा मुलगा/अविवाहित/घटस्फोटीत मुलगी आणि संबंधित मृत पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्या बाबतीत त्याची विधवा पत्नी /विधुर पती किंवा त्याचा मुलगा/अविवाहित/घटस्फोटीत मुलगी यांना पात्र व्यक्ती म्हणून विचारात घेण्यात यावे.

(ब) हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील. पोलीस विभागातील सर्व विभाग प्रमुख आणि कार्यालय प्रमुख यांनी वरील निर्णय त्यांच्या अधिपत्याखाली काम करणाऱ्या सर्व पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्या निदर्शनास आणावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( ब. बा. चव्हाण )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

**प्रति,**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व अपर पोलीस महासंचालक.
सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक.
सर्व पोलीस उप महानिरीक्षक.
सर्व पोलीस आयुक्त.
सर्व पोलीस अधिक्षक/लोहमार्ग पोलीस अधिक्षक.
सर्व समादेशक (राज्य राखीव पोलीस बल गट क्र. १ ते १३)
सर्व प्राचार्य ( पोलीस प्रशिक्षण विदयालये)
वित्त विभाग/सामान्य प्रशासन विभाग /सार्वजनिक बांधकाम विभाग.
सह सचिव (कार्यासन पोल-७).
निवड नस्ती (कार्यासन पोल-७).